गट विमा योजना, १९८२.
विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या
विमा/बचत निधीच्या रकमेवर
व्याज देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक: गविपो-१०९२/प्र.क्र. २/९२/सेपवि.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २७ मे १९९२.

संदर्भ:- [१] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक डीओआय २०८१/४७०१/एडीएम-५, दिनांक २६ एप्रिल १९८२.

[२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक गविपो ११८३/प्र.क्र. ६६/८४/प्रशा-५, दिनांक २८ फेब्रुवारी १९८६.

[३] शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक गविपो ११८५/प्र.क्र. ३५२/८५/एडीएम-५, दिनांक ७ मे १९८६.

प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना, १९८२ ही सर्व राज्य शासकीय कर्मचा--यांना मे १९८२ पासून सक्तीने लागू करण्यात आलेली आहे. ही योजना स्वयंस्पष्ट व स्वयंपूर्ण असून कर्मचा-यांना किंवा त्यांच्या वारसांना/कुटुंबियांना अनुज्ञेय असलेल्या विमा निधी/बचत निधी मधील रक्कम प्रदान करण्याबाबतच्या तरतुदी योजनेच्या परिच्छेद ११.१ ते ११.९ मध्ये दिलेल्या आहेत. असे असूनही राज्य शासनाच्या विविध विभागातून/कार्यालयातून सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांना, सेवा संपुष्टात आलेल्या कर्मचा-यांना अथवा सेवेत असताना अकाली निधन झालेल्या कर्मचा-यांच्या वारसांना/कुटुंबियांना गट विमा योजनेतील प्रदेय रकमा मंजूर करण्याबाबतचे आदेश काढण्यास तसेच मंजुरीनंतर प्रदेय रकमा देण्यात काही प्रकरणी बराच कालापव्यय होत असल्याचे आढळून आले आहे. परिणामत: योजनेचा उद्देश फलद्रूप होत नाही. तथापि, योजना स्वयंस्पष्ट व स्वयंपूर्ण असल्यामुळे प्रदेय रक्कम देण्याबाबत विलंब लागण्याची शक्यता वाटत नसल्यामुळे मूळ योजनेत व्याज देण्याची तरतूद समाविष्ट करण्यात आलेली नव्हती व त्यामुळे आजपर्यन्त व्याज देण्याचा प्रश्न उद्भवला नाही. मध्यंतरी काही प्रकरणी संबंधित कर्मचारी अथवा कर्मचा-यांच्या वारसांनी मा.लोक आयुक्तांकडे तक्रार केली असता मा. लोक आयुक्तांनी चौकशी केली. या प्रकरणी सदोष विलंब झाला असल्याचे लोक आयुक्तांच्या नजरेस आल्यामुळे व परिणामत: कर्मचा-यांना/कर्मचा-यांच्या वारसांना अनावश्यक त्रास व नुकसान सहन करावे लागल्यामुळे मा. लोक आयुक्तांनी नुकसान भरपाई म्हणून संबंधीत कर्मचा-यांना अथवा त्यांच्या वारसांना विलंब कालावधीसाठी व्याज देण्याची शिफारस केली. या संदर्भात शासनाने संपूर्ण परिस्थितीचे पुनर्विलोकन करुन नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना/सेवा संपुष्टात आलेल्या कर्मचा-यांना अथवा सेवेत असताना निधन पावलेल्या शासकीय कर्मचा-यांच्या वारसांना, त्यांचा वैयक्तिक दोष नसताना प्रशासकीय चुकीमुळे गट विमा योजनेची रक्कम मिळण्यास विलंब लागत असल्यामुळे, या विलंबाबाबत व्याज प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

निर्णय

शासन आता असे आदेश देत आहे की -

[एक] नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापासून अथवा राज्य शासनाकडील त्यांची सेवा संपुष्टात आलेल्या कर्मचा-यांना त्यांची सेवा संपुष्टात आल्याच्या दिनांकापासून किंवा सेवेत असताना अकाली निधन पावलेल्या कर्मचा--यांच्या वारसांना/कुटुंबियांना संबंधित कर्मचा-यांच्या मृत्यूच्या दिनांकापासून गट विमा योजनेच्या लाभाची रक्कम सर्व आवश्यक बाबींची पूर्तता करुन तीन महिन्यांच्या आत देण्यात यावी;

(दोन) सेवानिवृत्तीच्या वेळी कर्मचा-याविरुध्द विभागीय/न्यायिक कार्यवाही प्रलंबित असली तरी गट विमा योजनेची प्रदेय रक्कम सेवानिवृत्तीच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत देण्यात यावी;

(तीन) वरील बाब क्रमांक १ व २ येथे नमूद केल्याप्रमाणे सेवानिवृत्त कर्मचा-यांना किंवा राज्य शासनाकडील सेवा संपुष्टात आलेल्या कर्मचा-यांना किंवा सेवेत असताना निधन पावलेल्या कर्मचा-यांच्या वारसांना किंवा कुटुंबियांना त्यांचा वैयक्तीक दोष नसताना प्रशासकीय चुकीमुळे गट विमा योजनेची रक्कम तीन महिन्याच्या आत प्रदान करण्यात न आल्यास या कालावधीनंतरच्या विलंब कालाधीकरीता बचत निधीवर ज्या दराने व्याज दिले जाते त्या दराने व्याज अनुज्ञेय राहील;

(चार) बाब क्रमांक ३ अनुसार विलंब कालावधीसाठी व्याज अनुज्ञेय असले तरी अशा प्रत्येक प्रकरणी संबंधित प्रशासकीय विभागाने वित्त विभागाशी विचारविनिमय करुनच अंतिम निर्णय घ्यावा;

(पाच) गट विमा योजनेची प्रदेय रक्कम प्रदान करण्यास प्रशासकीय चुकीमुळे विलंब झाला असल्यास या चुकीस जबाबदार असणा-या कर्मचारी/अधिका-याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी व या प्रकरणी देय असलेली व्याजाची रक्कम या जबाबदार कर्मचारी/अधिकारी यांचेकडून वसूल करण्यात यावी. मात्र, विलंब कालावधीसाठी देय असलेली व्याजाची रक्कम ही गट विमा योजनेच्या प्रदेय रकमेबरोबरच, या प्रकरणात करण्यात येणा-या कार्यवाहीच्या निर्णयाची प्रतिक्षा न करता तात्काळ देण्यात यावी;

(सहा) एखाद्या प्रकरणी एकापेक्षा अधिक वारसांनी विम्याच्या रकमेवर हक्क दाखल केलेला असल्यास, जर विम्याची रक्कम रोखून ठेवण्यात आली असेल तर अशा प्रकरणी आपोआप व्याज देय ठरणार नाही. असे प्रत्येक प्रकरण गुणवत्तेनुसार वित्त विभागाच्या संमतीने तपासून अंतिम निर्णय घेण्यात यावा.

२. या आदेशाच्या दिनांकापूर्वी सेवानिवृत्त झालेल्या/सेवा समाप्त झालेल्या शासकीय कर्मचा--यांच्या किंवा सेवेत असताना मृत्यू पावलेल्या शासकीय कर्मचा-यांच्या वारसांना/कुटुंबियांना गट विमा योजनेच्या प्रदानासाठी निवृत्तीच्या/सेवा समाप्तीच्या/मृत्युच्या दिनांकापासून तीन महिन्यापेक्षा अधिक विलंब झाला असेल व हे आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यन्त त्यांना रकमेचे प्रदान करण्यात आलेले नसेल अशा प्रकरणीदेखील हे आदेश लागू राहतील. तथापि, अशा प्रकरणी व्याजाचे प्रदान हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांक किंवा निवृत्तीच्या/सेवा समाप्तीच्या/मृत्यूच्या दिनांकापासून तीन महिन्याचा कालावधी यापैकी जो नंतरचा दिनांक असेल त्या दिनांकापर्यन्त देय राहतील.

३. नियत वयोमान किंवा इतर कारणास्तव सेवानिवृत्ती/सेवा समाप्ती/मृत्यूची जी प्रकरणे हे आदेश निर्गमित करण्याच्या अगोदर अंतिमत: निकालात काढलेली आहेत ती पुन्हा सुरु करण्यात येऊ नयेत.

४. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श्री.ग. खळे,
उप सचिव, वित्त विभाग.

प्रति

(१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

(२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

(३) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

[४] महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर,

[५] संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

[६] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

[७] निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

[८] राज्यपालांचे सचिव,

[९] मुख्य मंत्र्यांचे सचिव,

[१०] सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

[११] मंत्रालयातील सर्व विभाग,

[१२] सर्व विभागीय आयुक्त,

[१३] मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,

× [१४] प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

× [१५] प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

× [१६] सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

× [१७] सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

× [१८] प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

[१९] मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई,

[२०] उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,

[२१] सर्व जिल्हा कोषागार अधिकारी व उप कोषागार अधिकारी,

[२२] विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

[२३] जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,

[२४] सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

[२५] संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई,

[२६] वित्त विभागातील सर्व कार्यासने,

[२७] निवड नस्ती, कार्यासन-सेपवि.

× पत्राद्वारे.

एप-१७८[१३,०००+१०-५-९२]-२